**राज्यातील जिल्हा व सत्र न्यायालये व त्यांच्या अधिपत्याखालील न्यायालयातील अधीक्षक, सहायक अधीक्षक संवर्गाची वेतनश्रेणी दिनांक १.४.२००३ पासून सुधारित केल्यामुळे कार्यरत व सेवानिवृत्त कर्मचा-यांना वेतनश्रेणीवाढ संबंधित थकबाकी अदा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधी व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण२०१४/प्र.क्र.२७/ कार्यासन-६**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक २० फेब्रुवारी, २०१७

**वाचा** :- शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, क्रमांक संकीर्ण२०१४/प्र.क्र.२७/ कार्यासन-६, दिनांक १८ऑक्टोबर,२०१६.

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, दिनांक १८ ऑक्टोबर, २०१६ अन्वये, दिनांक ०१.०४.२००३ ते दिनांक ३१.१२.२००५ या कालावधीमध्ये राज्यातील जिल्हा व सत्र न्यायालये व त्याच्या अधिपत्याखालील न्यायालये येथे कार्यरत व त्यादरम्यान सेवानिवृत्त झालेल्या अधीक्षक, सहायक अधीक्षक यांना दिनांक ०१.०४.२००३ पासून खालीलप्रमाणे सुधारित वेतनश्रेणी मंजूर केली आहे.

| अ. क्र. | पदनाम | ५व्या वेतन आयोगातील वेतनश्रेणी (रुपये) | शेट्टी आयोगानुसार ५व्या वेतन आयोगातील सुधारित वेतनश्रेणी (रुपये) | ६व्या वेतन आयोगातील समकक्ष वेतनश्रेणी (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | अधीक्षक | ५५००-९००० | ७४५०-११०५० | ९३००-३४८०० ग्रेड वेतन ४६०० |
| २ | सहायक अधीक्षक | ५०००-८००० | ६५००-१०५०० | ९३००-३४८०० ग्रेड वेतन ४४०० |

२. सदर सुधारित वेतनश्रेणीमुळे कार्यरत कर्मचा-यांना वेतनश्रेणीवाढ संबंधित थकबाकीची देय असलेली रक्कम दोन समान हप्त्यात सन २०१६-१७ आणि सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात आणि सेवानिवृत्त कर्मचारी यांना वेतनश्रेणीवाढ संबंधित थकबाकीची देय असलेली रक्कम सन २०१६-१७मध्ये अदा करण्यास मान्यता देण्यात आली आहे. तथापि कार्यरत व सेवानिवृत्त कर्मचा-यांना वेतनश्रेणीवाढ संबधित थकबाकीची देय रक्कम अदा करण्याबाबत पूरक मागणी निधी उपलब्धतेनुसार स्वतंत्रपणे आदेश निर्गमित करण्यात येतील असा निर्णय घेण्यात आला होता. सदर कर्मचा-यांना वेतनश्रेणीवाढ संबंधित थकबाकीची देय रक्कम अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, दिनांक १८ ऑक्टोबर, २०१६ अन्वये राज्यातील जिल्हा व सत्र न्यायालये व त्याच्या अधिपत्याखालील न्यायालयातील अधीक्षक व सहायक अधीक्षक या संवर्गाची वेतनश्रेणी दिनांक १.४.२००३ पासून सुधारित केल्यामुळे, कार्यरत कर्मचा-यांना वेतनश्रेणीवाढ संबंधित थकबाकीचा पहिला हप्ता सन २०१६-१७ या वित्तिय वर्षात अदा करण्यास व दुसरा हप्ता सन २०१७-१८ या वित्तिय वर्षात अदा करण्यास व सेवानिवृत्त कर्मचा-यांना वेतनश्रेणीवाढ संबंधित थकबाकीची देय रक्कम सन २०१६-१७ या वित्तिय वर्षात अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक जे-१, २०१४, न्यायदान, (दत्तमत) १०५ दिवाणी व सत्र न्यायालय (०२) (०१) जिल्हा व सत्र न्यायाधीश, संकेतांक क्रमांक २०१४ ०१७२" या लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५१/अर्थ-११, दिनांक १२.२.२०१७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२२०१२१७५६८३१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नावाने,

Rajendra D Sawant

Digitally signed by Rajendra D Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6c5df198d588de75e335db20487f4df45c73eca4ce5875cd77fd8b1924a3fdf8, cn=Rajendra D Sawant
Date: 2017.02.20 12:20:45 +05'30'

**(राजेंद्र सावंत)**
**विधि सल्लागार-नि-सहसचिव**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. राज्यपालाचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. सर्व विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई
४. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
५. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई
६. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा/मुळ शाखा), मुंबई
७. प्रबंधक, उच्च न्यायालय, नागपूर, औरंगाबाद व पणजी खंडपीठ
८. सर्व प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश
९. महालेखापाल- एक (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
१०. महालेखापाल-दोन (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
११. बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई

१२. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सीडीओ बॅरेक्स क्र.१ योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई-४०० ०२१
१३. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी,३१४, राज भुवन, एस.व्ही. पटेल रोड, मुंबई-४०० ००४
१४. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, (मार्क्सवादी) महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-४०० ०१३
१५. इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस(आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई४०० ०२५
१६. नॅशनॅलिस्ट काँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई-४०० ०२१
१७. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०० ०२८
१८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२०. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
२१. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२२. सर्व लेखाधिकारी, वेतन पडताळणी पथक, मुंबई/नागपूर/पुणे/औरंगाबाद
२३. वित्त विभाग (व्यय-५, सेवा-९), मंत्रालय, मुंबई
२४. विधी व न्याय विभाग कार्यासन-२३,२४ व २५
२५. निवड नस्ती, विधि व न्याय विभाग, कार्यासन-६